**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शीर्षांतर्गत निधी वितरण ( लेखाशीर्ष २२०२ १९०१, २२०२ १९४८ व २२०२ एच ९७३ )**

## महाराष्ट्र शासन.
## आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/ प्र.क्र. ०४ / का-६.
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ८.०५.२०२०.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग समक्रमांक, दि.२४.०४.२०२०.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची नस्ती क्र.अनुवि-४९२०/प्र.क्र.३३/अर्थसंकल्प.

**शासन निर्णय-**

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२० (महाराष्ट्र विनियोजन अधिनियम,२०२० यांच्या अनुसूचीच्या स्तंभ ४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रक्कमांसह) यास विधानमंडळाने मंजूरी दिली असून महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिली आहे आणि ते सन २०२० चा महाराष्ट्र अधिनियम क्र.१५ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण भाग-४, दि.१८.०३.२०२० मध्ये प्रसिद्ध करण्यात आले आहे.

त्या अनुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १६ एप्रिल,२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ३ महिन्याकरिता (जून, २०२० अखेर) अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. त्यानुसार वाचा येथील क्र.२ येथील शासन निर्णयान्वये आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत मागणी क्र.टी-५ मधील **२२०२-सर्वसाधारण शिक्षण** या मुख्य लेखाशिर्षातर्गत खालीलप्रमाणे योजनांकरीता एकुण अर्थसंकल्पीय तरतूदींपैकी **१० टक्के निधी शालेय शिक्षण विभागास** वितरीत करण्यात आला आहे. सद्यस्थितीत वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) ०१-वेतन व ३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांकरीता एकुण अर्थसंकल्पित तरतूदींच्या २० टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरणासाठी उपलब्ध करून देण्यात आला आहे. ही बाब विचारात घेऊन सदर योजनांकरीता उपलब्ध तरतूदींपैकी खालीलप्रमाणे उर्वरीत **१० टक्के निधी** प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु. हजारात)

| अ. क्र. | योजनेचे नाव | अर्थसंकल्पित तरतूद | यापुर्वी वितरीत करण्यात आलेली १० % तरतूद | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली १० % तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान.(२२०२ १९०१)- ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) | ५०००८३.०० | ५०००८.३० | ५०००८.३० |
| २ | अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान (२२०२ १९४८ ) - ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) | ४१५००.०० | ४१५०.०० | ४१५०.०० |

| अ. क्र. | योजनेचे नाव | अर्थसंकल्पित तरतूद | यापुर्वी वितरीत करण्यात आलेली १० % तरतूद | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली १० % तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ३ | सैनिक शाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य (२२०२ एच ९७३) - ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) | १५१७११.०० | १५१७१.१०० | १५१७१.१०० |
| **एकुण** | | ६९३२९४.०० | ६९३२९.४० | ६९३२९.४० |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डाऊनमुळे पुढील ३ ते ४ महिने राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरूपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा. सदर निधीचा वापर नियमित वेतन अदायगीकरीताच करण्यात यावा. सद्यस्थितीत कोणत्याही प्रलंबित दायित्व (Arrears) अदा करण्यासाठी वापर करण्यात येऊ नये.

३. विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी वितरीत तरतुदी त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित कराव्यात. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००४२४१०१२३०२९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.05.08 16:53:13 +05'30'

(रविंद्र दि.औटे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती.
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
८. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.